राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत तलाठी प्रशिक्षण कार्यक्रमांच्या खर्चासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण -२०२३/प्र.क्र.२१७/ई-१०**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- ०८ ऑगस्ट, २०२४

वाचा:- (१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दि.२३/०९/२०११
(२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.तप्रशि-२०१२/प्र.क्र.२४२-अ/ई-१०, दि.२४/०३/२०१४
(३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.टीआरएन-२०१४/४४०/प्र.क्र.६६/१४/१२-अ, दि.०१/११/२०१४
(४) समक्रमांकाचे शासन ज्ञापन दिनांक १२.०२.२०२४ व दिनांक २१.०३.२०२४

**प्रास्ताविक:-**

शासनाने राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत तलाठी पदावर प्रथम नियुक्ती देण्यापूर्वी नवनियुक्त तलाठी कर्मचाऱ्यांना सहा महिन्याचे पायाभूत प्रशिक्षण देण्याबाबत संदर्भ क्र.(२) येथील दि.२४/०३/२०१४ अन्वये निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार विभागीय आयुक्त, अमरावती (डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती) यांना रु.१,०८,८८,०००/- व रु. ५०,००,०००/- इतका निधी अनुक्रमे दि.१२.०२.२०२४ व दिनांक २१.०३.२०२४ रोजीच्या शासन ज्ञापनान्वये वितरीत करण्यात आला आहे.

विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर (मराठवाडा महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, छत्रपती संभाजीनगर) यांना रु.१,००,००,०००/- व रु. ५०,००,०००/- इतका निधी अनुक्रमे दि.१२.०२.२०२४ व दिनांक २१.३.२०२४ रोजीच्या शासन ज्ञापनान्वये वितरीत करण्यात आला आहे.

विभागीय आयुक्त, पुणे - विभागीय महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, बावधन बु. ता. मुळशी जि. पुणे यांना दि.२१.०३.२०२४ रोजीच्या ज्ञापनान्वये रु.५०,००,०००/- इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

विभागीय आयुक्त कार्यालय, नाशिक- विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक यांना दि.२१.०३.२०२४ रोजीच्या ज्ञापनान्वये रु.५०,००,०००/- इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

आता, आर्थिक वर्ष २०२४-२०२५ करीताचा (२०५२ ५२०५) या लेखाशिर्षाअंतर्गत मंजूर निधीपैकी शिल्लक असलेल्या निधीतून राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत देण्यात आलेल्या प्रशिक्षण शुल्काचा निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**-

राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत महसूल विभागातील तलाठी संवर्गातील कर्मचाऱ्यांना देण्यात येणाऱ्या प्रशिक्षणाकरीता विभागीय आयुक्त, अमरावती (डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती) व विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर (मराठवाडा महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, छत्रपती संभाजीनगर) यांना खालील तक्त्यामध्ये नमूद केल्याप्रमाणे निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.:-

| विभाग | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|
| विभागीय आयुक्त, अमरावती (डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती) | रु.९४,८३,०००/- |
| विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर (मराठवाडा महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, छत्रपती संभाजीनगर) | रु.९४,८३,०००/- |
| **एकूण** | १,८९,६६,०००/- |

२. सदरचा मंजूर करण्यात आलेला निधीचा खर्च विभागीय आयुक्त, अमरावती व छत्रपती संभाजीनगर यांनी मुख्य लेखाशीर्ष मागणी क्र.सी-४, २०५२ सचिवालयीन सर्वसाधारण सेवा, (००) (०१) शासकीय कर्मचाऱ्यांचे प्रशिक्षण (२०५२ ५२०५) २०-इतर प्रशासकीय खर्च या उद्दीष्टांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीताच्या अर्थसंकल्पिय मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढलेली रक्कम, महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री संबंधितांनी करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

४. संस्थेने वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र महालेखापाल, लेखापरीक्षा महाराष्ट्र १/२ व शासनास तातडीने सादर करावे.

**५.** सदर शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२/०४/२०२३ प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०८११०४०११२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SANJAY RAGHUNATH BANKAR

Digitally signed by SANJAY RAGHUNATH BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d74962
9970f349fc6ed260, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9
A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY RAGHUNATH BANKAR
Date: 2024.08.08 11:18:35 +05'30'

**( संजय बनकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र २, नागपूर
३) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) विभागीय आयुक्त, अमरावती /छत्रपती संभाजीनगर/पुणे व नाशिक
६) सह सचिव, वित्त विभाग (अर्थ-३), मंत्रालय, मुंबई.
७) कक्ष अधिकारी, (ब-१ / ब-२ / ई-१अ ) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवडनस्ती (कार्यासन ई-१०) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.